**स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, जनगणना कर्मचारी, निवडणूक कर्मचारी इत्यादी विविध घटकांना वयोमर्यादेत सवलत व टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: निवक-१०१०/प्र.क्र. ०८/२०१०/१६-अ,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ६ ऑक्टोंबर, २०१०.**

**वाचा :** १) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १००६/मुमंस-४९४/प्र.क्र.६६/२००६/१६-अ, दिनांक १० जून, २००८ (दिनांक ४ ऑगस्ट, २००९ च्या शुद्धीपत्रासह)
२) शासन निर्णय क्रमांक : पअंक १००९/प्र.क्र. २००/२००९/१६-अ, दिनांक २७ ऑक्टोबर, २००९.

**प्रस्तावना :**

स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, सन १९९४ नंतरचे निवडणूक कर्मचारी, अनुकंपा तत्त्वावर नोकरी मिळण्यास पात्र असलेले उमेदवार याकरिता शासकीय /निमशासकीय सेवेमध्ये प्रवेश मिळण्याकरिता उच्चतम वयोमर्यादा वाढविणे, विविध घटकातील उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेत नोकरी मिळाल्यानंतर टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्याबाबत काही मुदत देणे जेणेकरुन ह्या घटकातील उमेदवारांना शासन सेवेत प्रवेश घेणेसाठी अधिक संधी उपलब्ध होतील, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळाने दिनांक ०८ सप्टेंबर, २०१० रोजी झालेल्या बैठकीत विचारात घेतला. सदर प्रस्तावावर मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**(१)** **(अ)** स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, **(ब)** सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, व **(क)** सन १९९४ नंतरचे निवडणूक कर्मचारी या घटकातील उमेदवारांना शासकीय/निम शासकीय इ. सेवेतील "गट-क" व "गट-ड" मधील पदावर नियुक्ती मिळण्यासाठी कमाल वयोमर्यादा ४५ वर्षे इतकी वाढविण्यास शासन मान्यता देत आहे. सदर वयोमर्यादा सरसकट शिथिल केलेली असल्याने या घटकातील मागासवर्गीय उमेदवारांसाठी उच्चतम वयोमर्यादा ४५ वर्षे इतकीच राहील. वयोमर्यादेची सवलत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील "गट-क" व "गट-ड" पदावरील नियुक्तीसाठीच अनुज्ञेय राहील.

**(२)** प्रकल्पग्रस्त, भूकंपग्रस्त, स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, सन १९९४ नंतरचे निवडणूक कर्मचारी व पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचारी या सर्व घटकातील उमेदवारांना, जर त्यांना लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती मिळाली, तर टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी नियुक्तीच्या दिनांकापासून ६ महिने इतक्या कालावधीची मुदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. उपरोल्लेखीत विविध घटकातील उमेदवारांना नियुक्त्या देण्यासाठी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: संकीर्ण-१००३/प्र.क्र.९६/२००३/१३-अ, दिनांक १९ नोव्हेंबर, २००३ अन्वये स्पष्ट केलेली कार्यपद्धती अनुसरणे बंधनकारक आहे.

३.	हा शासन निर्णय शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे, नगरपालिका/महानगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे, अशी इतर सर्व प्राधिकारणे, सेवा व संस्था यांना लागू राहील.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१०१००६१६१४२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(सु. ना. रणखांबे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सर्व विधानसभा सदस्य / सर्व विधान परिषद सदस्य,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा / अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई / खंडपीठ औरंगाबाद / नागपूर,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* संचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई,
* प्रोथोनेटरी ॲण्ड सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा /नगरपालिका,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग/मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
वित्त विभाग, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (१० प्रती),
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (५ प्रती),
सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष कार्यालय, महाराष्ट्र राज्य,
निवड नस्ती/सा.प्र.वि, कार्यासन १६-अ.
*** (पत्राने)**